राज्यातील विविध वर्गवारीतील वीज ग्राहकांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (समायोजनाने) सन २०२२-२३.

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२२/प्र.क.६०/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२३

संदर्भ :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२२/प्र. क्र. ४३/अर्थ-३, दि.०४ एप्रिल, २०२२
२) महावितरण कंपनीचे पत्र क्र. पी-कॉम/शासन/मागणी/सवलत(GEN)/१०८७१, दि. २९.०४.२०२२.
३) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.६०/ऊर्जा-३, दिनांक २९ जुलै, २०२२
४) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.६३/ऊर्जा-३, दिनांक २५ नोव्हेंबर, २०२२
५) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.६३/ऊर्जा-३, दिनांक २१ फेब्रुवारी, २०२२

प्रस्तावना :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार विद्युत वितरण कंपनीला वीज दरात सवलत देण्यात येते व त्याची प्रतिपूर्ती शासनाकडून वितरण कंपनीस केली जाते. महावितरण कंपनीला (१) वस्त्रोद्योग ग्राहकांना वीज सवलतीसाठी सन २०२२-२३ करिता लेखाशिर्ष २८०१५५९९ खाली अर्थसंकल्पित केलेल्या रु. ७१९.७७ कोटी रक्कमेपैकी उर्वरित रु. २५२.०८ कोटी व (२) औद्योगिक ग्राहकांना वीज सवलतीसाठी सन २०२२-२३ करिता लेखाशिर्ष २८०१५६०५ खाली अर्थसंकल्पित केलेल्या रु. ३३८७.९६ कोटी रक्कमेपैकी उर्वरित रु. २१८७.९६ कोटी रक्कम समायोजनाने वितरीत करण्यास वित्त विभागाने दिलेल्या मंजूरीनुसार एकूण रु. २४४०.०४ कोटी रक्कम महावितरणला समायोजनाने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

वस्त्रोद्योग ग्राहकांना वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी सन २०२२-२३ करिता पुरवणी मागणीद्वारे डिसेंबर, २०२२ मध्ये अर्थसंकल्पित केलेली रु. ५९१.८५ कोटी पैकी रु. २५२.०८ कोटी (रुपये दोनशे बावन्न कोटी आठ लाख फक्त) रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना समायोजनाने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणीक्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १०४, वीज विकास व्यवस्था राष्ट्रीय भार, (०१) वीज दरात सवलत, (०१) (०३) वस्त्रोद्योग ग्राहकांना वीजदर सवलत (सर्वसाधारण) (२८०१५५९९), (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

२. औद्योगिक ग्राहकांना वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी सन २०२२-२३ करिता पुरवणी मागणीद्वारे डिसेंबर, २०२२ मध्ये अर्थसंकल्पित केलेली रु. २१८७.९६ कोटी (रुपये दोनहजार एकशे सत्त्याऐंशी कोटी शहाण्णव लाख फक्त) रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना समायोजनाने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. उक्त प्रयोजनासाठी

होणारा खर्च "मागणीक्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १०४, वीज विकास व्यवस्था राष्ट्रीय भार, (०१) वीज दरात सवलत, (०१) (०४) औद्योगिक ग्राहकांना वीजदर सवलत (सर्वसाधारण) (२८०१५६०५), (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. समायोजनाने वितरीत करावयाची एकूण रक्कम रु. २४४०.०४ कोटी (रुपये दोन हजार चारशे चाळीस कोटी चार लाख फक्त) महावितरण कंपनीस रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महावितरण कंपनी मर्या., यांच्याकडून शासनास येणे असलेल्या रक्कमेपोटी वसूल करण्यात यावी व खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली समायोजनाव्दारे जमा करण्यात यावी.

| अ. क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| | **लेखाशिर्ष- २८०१५५९९** | | |
| १) | वित्तीय वर्ष २०२२-२३ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (अंदाजित जानेवारी, २०२३ ते मार्च, २०२३ उर्वरित अंशत:) (१६१६,१५,९९,४००-२५२,०८,००,०००=१३६४,०७,९९,४००) | २५२,०८,००,०००/- | ०००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्रीय यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रक्कमा (०००४३००९२) |
| | **एकूण २८०१५५९९** | **२५२,०८,००,०००/-** | |
| | **लेखाशिर्ष- २८०१५६०५** | | |
| १) | वित्तीय वर्ष २०२२-२३ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (अंदाजित जानेवारी, २०२३ ते मार्च, २०२३ उर्वरित पुर्ण) (१३६४,०७,९९,४००-१३६४,०७,९९,४००=०) | १३६४,०७,९९,४००/- | ०००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्रीय यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रक्कमा (०००४३००९२) |
| २) | वित्तीय वर्ष २०२२-२३ या वर्षातील विद्युत विक्रीकरापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (अंदाजित जानेवारी, २०२३ ते मार्च, २०२३ पुर्ण) (१०५,९४,००,०००-१०५,९४,००,०००=०) | १०५,९४,००,०००/- | ०००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्री यावरील कर (०१) (०३ ) महाराष्ट्र विजेच्या विक्रीवरील कर (०००४३००८३) (सुधारणा) अधिनियम २००४ |
| ३) | वित्तीय वर्ष २०२१-२२ अखेर विद्युत शुल्कापोटी फरकाच्या रक्कमेपैकी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (अंदाजित अंशत: २३६६,७५,००,०००-७१७,९४,००,६००= १६४८,८०,९९,४००) | ७१७,९४,००,६००/- | ०००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्रीय यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रक्कमा (०००४३००९२) |
| | **एकूण २८०१५६०५** | **२१८७,९६,००,०००/-** | |
| | **एकूण (२८०१५५९९+२८०१५६०५)** | **२४४०,०४,००,०००/-** | |

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात वरील विवरणपत्रानुसार सदर रक्कम रु. २४४०.०४ कोटी (रुपये दोन हजार चारशे चाळीस कोटी चार लाख फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन तसे शासनास कळवावे.

५. सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल, मुंबई यांच्या अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने रक्कम रु. २४४०.०४ कोटी (रुपये दोन हजार चारशे चाळीस कोटी चार लाख फक्त) सदर रकमेचे देयक तयार करण्यात येवू नये.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०३३११४२४३६१७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A4719B885E07A486, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2023.04.10 17:20:58 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. सर्व मंत्री / सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई,
५. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधान भवन मुंबई,
६. सर्व विधान सभा/परिषद सदस्य,विधान भवन, मुंबई,
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
१३. सर्व विभागीय आयुक्त,
१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
१६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१८. सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधार कंपनी मर्या.,मुंबई,
२०. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२१. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२२. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२३. सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई.
२४. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे,
२५. उप सचिव/ ऊर्जा-३/५, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२६. मुख्य विद्युत निरिक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. अवर सचिव, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२८. कक्ष अधिकारी (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई-३२
२९. कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३०. निवड नस्ती, ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.